
टोप्या द्या,
टोप्या........
एक लोककथा

"टोप्या घ्या टोप्या.....! "टोप्या घ्या टोप्या.....!
१० रुपयाला एक...."टोप्या घ्या टोप्या.....! "

एक फेरीवाला असे ओरडत, आपल्या डोक्यावरची रंगीबेरंगी टोप्याची चळत संभाळत, खूप जपून रस्त्यावरून चालला होता.

एके दिवशी त्या फेरीवाल्याने शहराबाहेर जाऊन एका झाडाखाली डुलकी घेतली. तो झाडाखाली डोक्यावरची टोप्यांची चळत संभाळत झाडाला टेकून बसला. त्याला झोप लागली. डोक्यावरच्या टोप्यांची चळत तशीच्या तशी होती. तो झोपला असे पाहून झाडावरच्या खट्याळ वानरांनी त्याच्या सर्व टोप्या चोरून नेल्या. आता फेरीवाल्याच्या डोक्यावर फक्त त्याची स्वत:ची टोपी राहिली. जेव्हा त्याला जाग आली तेव्हा त्याने टोप्या शोधण्याचा खूप प्रयत्न केला. तो अगदी निराश झाला.......तेव्हाच त्याला त्याच्या टोप्या मिळाल्या........

ही लोककथा, पारंपारिक श्रेष्ठ लोककथामधील एक लोककथा आहे.



# "टोप्या घ्या टोप्या.....!

एक लोककथा

मराठी : गार्गी लागू



एक फेरीवाला होता. तो टोप्या विकत असे. तो आपल्या टोप्याची चळत डोक्यावर ठेऊन रस्त्यावरून हिंडत असे.

सर्वात प्रथम तो स्वत:ची चौकडीचे डिझाइन असलेली टोपी घालीत असे. त्याच्यावर काही काळपट रंगाच्या, त्याच्यावर पिवळ्या रंगाच्या, नंतर निळ्या रंगाच्या, आणि सर्वात शेवटी लाल रंगाच्या टोप्या ठेवित असे.



अश्याप्रकारे तो रस्त्यावरून चालत असे.
टोप्या पडू नयेत म्हणून तो स्वत:ला
एकदम ताठ ठेवित असे.

चालता चालता तो ओरडर असे,
"टोप्या घ्या टोप्या.....!
टोप्या घ्या टोप्या.....!
फक्त १० रुपयात एक टोपी......."



एक दिवस त्याची एकही टोपी विकली गेली नाही. तो रस्त्यावरून पुढे गेला....परत मागे आला....तो जोरजोराने ओरडत राहिला...

"टोप्या घ्या टोप्या.....!
टोप्या घ्या टोप्या.....!
फक्त १० रुपयात एक टोपी......."

पण त्यादिवशी बहुतेक कुणालाच टोपी विकत घ्यायची नव्हती. लाल रंगाची टोपीसुध्या कुण्णाला नको होती. फेरीवाल्याला खूप भूक लागली. पण खाण्यासाठी त्याच्याजवळ पैसेही नव्हते.

"मी शहराच्या बाहेर फिरून येतो" असे म्हणून तो शहराच्या बाहेर गेला. तो हळू हळू चालत होता....डोक्यावरची टोप्यांची चळत संभाळत......



तो खूप वेळ चालत राहिला. शेवटी त्याला एक मोठं झाड दिसले. "ही जागा विश्रांती घेण्यासाठी चांगली आहे," त्याने विचार केला.

मग तो हलकेच झाडाच्या खाली बसला. पाठीला झाडाचा आधार दिला ज्या योगे डोक्यावरच्या टोप्या पडणार नाहीत.

मग हाताने टोप्या व्यवस्थित आहेत याची खात्री करून घेतली.

प्रथम स्वत:ची चौकटीची टोपी, त्यावर काळपट रंगाच्या, त्यावर निळ्या रंगाच्या, त्यावर पिवळ्या रंगाच्या, आणि सर्वात वरती लाल रंगाच्या टोप्या!



सर्व टोप्या बरोबर होत्या.
मग तो झोपून गेला.
बराच वेळ झोपून राहिला.



झोपून उठल्यावर त्याला
खूपच ताजेतवाने वाटले.



उठून उभे रहाण्या आधी
त्याने डोक्यावरील टोप्या
हाताने चाचपल्या.

पण त्याच्या हाताला फक्त
त्याचीच चौकड्या असलेली
टोपी लागली.



त्याने आपल्या उजव्या बाजूला
पाहिले. त्याला एकही टोपी
दिसली नाही.

त्याने आपल्या डाव्या बाजूला
पाहिले, त्याला एकहि टोपी
दिसली नाही.

त्याने आपल्या मागे पाहिले,
त्याला एकहि टोपी दिसली नाही.

मग त्याने झाडाच्या मागे
पाहिले, त्याला एकहि टोपी
दिसली नाही.



मग त्याने झाडावर पाहिलं.

त्याला काय दिसलं?

झाडाच्या प्रत्येक फांदीवर एक एक वानर बसले होते.

प्रत्येक वानराच्या डोक्यावर टोपी होती. कुणाच्या डोक्यावर काळपट, कुणाच्या पिवळी, नीळी, आणि कुणाच्या डोक्यावर लाल टोपी होती.

फेरीवाल्याने वानरांकडे पाहिले.
....वानरांनी फेरीवाल्याकडे पाहिले.

काय करायला पाहिजे हे त्याला
कळत नव्हते.

शेवटी त्याने वानराना काही
सांगितले.......



वानरांकडे बोट दाखवित तो म्हणाला,
"खट्याळ माकडांनो, माझ्या टोप्या
मला परत द्या.“

वानरांनीही फेरीवाल्याकडे बोटे
नाचवून दाखविली व म्हणाली,
"हो, हो, हो, हो......."



ते पाहून फेरीवाल्याला राग आला. त्याने आपल्या दोनही हाताच्या मुठी वानरांच्या दिशेने जोरांत हलविल्या आणि ओरडला, "खट्याळ माकडांनो, माझ्या टोप्या मला परत द्या."

मग वानरांनीही मुठी फेरीवाल्याच्या दिशेने हालविल्या आणि ओरडली,
"हो, हो, हो, हो......."



आता फेरीवाल्याला खूपच राग आला.
त्याने आपला पाय जमिनीवर जोराने
आपटला आणि ओरडून म्हणाला,
"खट्याळ माकडांनो, माझ्या टोप्या
मला परत द्या."

मग वानरांनीही त्यांचा एक पाय फांदीवर
आपटला आणि म्हणाली,
"हो, हो, हो, हो......."



फेरीवाल्याला खूपच राग आला. आता त्याने आपले दोनही पाय जमिनीवर आपटले आणि म्हटले,
"हे बघा माकडांनो, मला जास्त त्रास देऊ नका. माझ्या टोप्या मला परत द्या."

पण वानरांनीही आपले दोनही पाय आपटले व म्हणाली, "हो, हो, हो, हो......."



शेवटी फेरीवाल्याने आपल्या डोक्यावरची टोपी काढून रागाने जमिनीवर फेकून दिली. आणि तिथून जायला निघाला.



मग प्रत्येक वानरानेही आपल्या

डोक्यावरची टोपी काढली........



मग काय, सार्‍या काळपट
टोप्या, सगळ्या पिवळ्या
टोप्या, सगळ्या नीळ्या टोप्या,
आणि सगळ्या लाल रंगाच्या
टोप्यासुध्या झाडावरून उडत
खाली आल्या.



मग मात्र फेरीवाल्याने सगळ्या टोप्या झटपट गोळा केल्या आणि परत आपल्या डोक्यावर ठेवल्या.

प्रथम त्याची स्वत:ची चौकडीचे डिझाईन असलेली..डोक्यावर घातली...मग काही काळपट रंगाच्या, त्याच्यावर पिवळ्या रंगाच्या, नंतर निळ्या रंगाच्या, आणि सर्वात शेवटी लाल रंगाच्या टोप्या ठेवल्या.



मग फेरीवाला हळूहळू शहराच्या

दिशेने चालू लागला. चालता चालता

त्याचे ओरडणे सुरूच होते....

"टोप्या घ्या टोप्या.....!

टोप्या घ्या टोप्या.....!

फक्त १० रुपयात एक टोपी......."




**समाप्त**